**राज्यातील १०० जलदगती न्यायालयातील ५००**
**अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : जगन्या १४१८/प्र.क्र.२७/का.नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- १४ सप्टेंबर, २०२०.

पहा :-१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र: जगन्या २०१६/प्र.क्र.१७६/का-९, दि.३१.०३.२०१६.

२) जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती यांचे पत्र क्र. बी-४(आस्था)/१६११/२०२०,दि. ७.०९.२०२०

३) जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे यांचे पत्र क्र.Temp./Conti./३११२/२०२०, दि.८.०७.२०२०.

४) जिल्हा व सत्र न्यायालय, नागपूर यांचे पत्र क्र. बी-४(१०)/२२४४/२०२०, दि. ७.०९.२०२०.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०.

**प्रस्तावना :**

राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी दि.१ एप्रिल, २०१६ ते दि.३१ मार्च, २०२१ या ५ वर्षांच्या कालावधीसाठी १०० जलदगती न्यायालयांना मुदतवाढ देण्यात आलेली आहे. या न्यायालयांकरिता आवश्यक असणारी तदर्थ जिल्हा न्यायाधिश व त्यांच्या सहाय्यभूत कर्मचारी वर्गासह एकूण ५०० पदे पुढे दि. ३१.०८.२०२० पर्यंत सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती. सदर अस्थायी पदे पुढे सुरु ठेवण्याची विनंती जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती,नागपूर आणि पुणे यांनी संदर्भीय अनुक्रमांक २ ते ४ येथील प्रस्तावान्वये केली आहे. संदर्भ क्र.५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील १०० जलदगती न्यायालयातील पुढील तक्त्यामध्ये दर्शविलेली ५०० अस्थायी पदे दि.१ सप्टेंबर, २०२०ते दि. २८फ़ेब्रुवारी, २०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | तदर्थ जिल्हा न्यायाधीश | १०० |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १०० |
| ३ | पेशकार (वरिष्ठ लिपीक) | १०० |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १०० |
| ५ | शिपाई | १०० |
| | **एकूण पदे** | ५०० |

२. याकरिता येणारा खर्च "२०१४, न्यायदान- (भारित) १०२- उच्च न्यायालये, १०२ (०९) (०१) न्यायालयाची दर्जावाढ व प्रलंबित प्रकरणे त्वरित निकालात काढण्यासाठी विशेष अनुदान २०१४ ०३८८" या शिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१५१४३८४८१६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.09.15 14:39:58 +05'30'

**(उदय बा. शुक्ल)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रत आवश्यक त्या तात्काळ कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. मा. प्रबंधक (निरिक्षणे-१), मा.उच्च न्यायालय, मुंबई,
३. मा.प्रबंधक(निरिक्षणे), उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई,
४. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
९. महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१०. वित्त विभाग/ व्यय-५
११. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,
१२. निवडनस्ती